**स्वातंत्र्यपूर्व काळात स्थापन झालेल्या शिक्षण संस्थांना विशेष आर्थिक मदत देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२३८/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०१७.

वाचा :- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक:- माशाअ १५१४/ प्र.क्र.६७/२०१४/एसएम-४, दिनांक ३ मार्च, २०१४,
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक :- विअप्र-१०९२/प्र.क्र.१७०/९२/ विनियम, दिनांक ७ सप्टेंबर, १९९२,
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण - २०१५/प्र.क्र.४९/ १५/विनियम, दिनांक २ सप्टेंबर, २०१५.

प्रस्तावना :-

स्वातंत्र्यपूर्व काळापासून कार्यरत असलेल्या व शैक्षणिक क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करून शाळेची गुणवत्ता राखून ठेवणा-या स्वातंत्र्यपूर्व काळातील इंग्रजी शाळा वगळून अन्य माध्यमाच्या शाळांचा सर्वांगीण विकास होण्याच्या दृष्टीने विहित निकष, ज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे निवड करून पात्र ठरलेल्या १०० शाळांना प्रत्येकी रूपये १०.०० लक्ष (अक्षरी रूपये दहा लक्ष फक्त) च्या मर्यादेत विशेष अर्थसहाय्य देण्याबाबत शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या शासन निर्णय क्र.माशाअ-१५१४/(६७/२०१४)/एसएम-४, दि. ३ मार्च, २०१४ अन्वये आदेश दिले आहेत.तथापि, सदर प्रस्तावास व शासन निर्णयास वित्त विभागाची पूर्व मान्यता घेण्यात आलेली नाही.

२. राज्याच्या आर्थिक व्यवस्थेवर परिणाम करणा-या वित्तीय/आर्थिक भाराच्या प्रस्तावास वित्त विभागाशी विचारविनिमय करुन त्या विभागाची मान्यता घेणे आवश्यक असल्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र. २ व ३ येथील शासन परिपत्रकान्वये सूचना दिल्या आहेत.

३. राज्याची सध्याची आर्थिक स्थिती, आर्थिक संसाधने, राज्याच्या गरजा व त्यांचा प्राधान्यक्रम विचारात घेऊन सदर १०० शाळांसाठी रु.१० कोटी एवढा निधी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही. ही वस्तुस्थिती व याबाबतचे वित्त विभागाचे अभिप्राय विचारात घेऊन संदर्भाधीन क्र.(१) येथील दिनांक ३ मार्च, २०१४ चा शासन निर्णय रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

स्वातंत्र्यपूर्व काळात स्थापन झालेल्या संस्थांना विशेष आर्थिक सहाय्य देण्याबाबतचा संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशाअ-१५१४/(६७/२०१४)/एसएम-४, दि.३ मार्च, २०१४ या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०७०५१७४८०६४६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.07.05 17:48:39 +05'30'

( नंदकुमार )
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति**

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
२) सर्व सन्माननिय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२,
४) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
५) मा.प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक,
६) शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
७) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
९) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१०) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) सर्व जिल्हा परिषदा,
१४) अधिक्षक, वेतन पथक, सर्व जिल्हा परिषदा,
१५) कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१६) कार्यासन व्यय-५ व कार्यासन- विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१७) निवड नस्ती कार्यासन एसएम-४, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.